**दुष्काळग्रस्त तालुक्यातील गोशाळांमध्ये पशुधनाकरीता राहत व चारा शिबीर (कॅटल रिलिफ ॲण्ड फॉडर कॅम्प) सुरु करण्याच्या प्रयोजनार्थ पशुसंवर्धन विभागास रुपये १०.०० कोटी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन (म. व पु.) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-०२/२०१९/प्र.क्र.१३/म-११**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा</u> :-

१. महसूल व वन विभाग, शासननिर्णय क्रमांक-एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/ म-७, दि. ३१/१०/२०१८.
२. कृषी व पदुम विभागाचा शासननिर्णय क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.१७/पदुम-३, दि.०९/०१/२०१९.
३. महसूल व वन विभाग, शासननिर्णय क्रमांक-एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/ म-७, दि.१४/०२/२०१८.

<u>प्रस्तावना</u> :-

सन २०१८ च्या खरीप हंगामात राज्यातील २६ जिल्हयामधील १५१ तालुक्यात दिनांक ३१/१०/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दुष्काळ घोषित केला आहे. दुष्काळी परिस्थितीमुळे त्या भागातील पशुधनासाठी आवश्यक असणारा चारा व पाणी या प्रश्नांवर मात करण्यासाठी दिनांक ०३/०१/२०१९ रोजीच्या मंत्रीमंडळ उपसमितीच्या बैठकीत राज्यात गोरक्षण संस्थामध्ये चारा छावण्या सुरु करुन इच्छुक शेतकऱ्यांनी त्यांची जनावरे गोरक्षण संस्थेमध्ये ठेवण्यास आवाहन करावे. त्यानुसार इच्छुक शेतकऱ्यांनी त्यांची जनावरे अशा गोरक्षण संस्थामध्ये ठेवल्यास त्यांना संस्थेच्या प्रचलित नियमानुसार SDRF अंतर्गत विहित केलेल्या दरानुसार अनुदान देण्यात यावे. त्यासाठी पशुसंवर्धन विभागाने आवश्यक रकमेची मागणी मदत व पुनर्वसन विभागाकडे करावी, असा निर्णय घेण्यात येऊन औरंगाबाद, उस्मानाबाद, जालना, बीड व परभणी या पाच ठिकाणी गोरक्षण संस्थामध्ये चारा छावण्या सुरु करण्याबाबत विचार करण्यात यावा असे ठरले, सदर ०५ दुष्काळग्रस्त जिल्हयात गोशाळामध्ये प्रायोगिक तत्वावर त्या परिसरातील पशुधनासाठी पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलिफ ॲण्ड फॉडर कॅम्प) सुरु करण्याचा निर्णय घेण्यात आला त्यानुसार पाच जिल्हयातील एकूण ०६ गोशाळांसाठी पशुसंवधन विभागास प्रथम टप्प्यात रुपये १०.०० कोटी इतका निधी मदत व पुनर्वसन विभागाकडून उपलब्ध करुन देण्यास उपरोक्त वाचा क्रमांक ०३ दिनांक १४/०२/२०१९ च्या शासननिर्णयान्वये मान्यता देण्यात आली. त्यानुसार पशुसंवर्धन विभागास रुपये १०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

औरंगाबाद, उस्मानाबाद, जालना, बीड व परभणी या पाच जिल्हयातील सहा गोशाळेमध्ये पशुसंवर्धन विभागाकडून सुरु करण्यात आलेल्या पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलिफ ॲण्ड फॉडर कॅम्प) या प्रयोजनासाठी पशुसंवर्धन विभागास **रुपये १०.०० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त)** इतका निधी पशुसंवर्धन विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BEAMS) वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात मागणी क्रमांक सी-६, २२४५ - नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य अंतर्गत-०१ अवर्षण-१०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती निधीच्या मानकांनुसार खर्च (९१)(०३) जनावरांच्या छावण्यामध्ये चारा, पाणी, औषध यांचा पुरवठा व छावण्यापर्यंत वाहतूकीचा खर्च (अनिवार्य),३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ ००७५)** या उपशीर्षाखालील उपलब्ध निधीतून **रुपये १०.०० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त)** इतका निधी पशुसंवर्धन विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्यात येत आहे. पशुसंवर्धन विभागाने सदर खर्च वर नमूद केलेल्या बाबींवर अंतिमत: खर्ची टाकावा.

३. सदर निधी चालू आर्थिक वर्षातच खर्च होणे अपेक्षित असून, तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरीत करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही, याचीही दक्षता घेण्याच्या सूचना पशुसंवर्धन विभागाने संबंधितांना द्याव्या. पशुसंवर्धन विभागाने सदर निधीची जिल्हानिहाय उपयोगिता प्रमाणपत्रे एप्रिल, २०१९ च्या पहिल्या आठवडयात उपलब्ध करून देण्याच्या प्रमुख अटीवर या निधीचे वितरण करण्यात येत आहे.

४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची पशुसंवर्धन विभागाने खातरजमा करावी व हा निधी पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलिफ ॲण्ड फॉडर कॅम्प) या प्रयोजना व्यतिरिक्त अन्य उपाययोजनांसाठी व इतर बाबींवर खर्च होणार नाही, याची पशुसंवर्धन विभागाने दक्षता घ्यावी.

५. **वितरीत निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) अथवा बँक खात्यात न ठेवता तो गोशाळा संस्थाना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल, या अटींच्या अधिन निधी वितरीत करण्यात येत आहे. तरी त्यानुसार पशुसंवर्धन विभागाने कार्यवाही करावी.**

६. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती पशुसंवर्धन विभागाने या विभागाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे/नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात याव्यात. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्रक पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत पशुसंवर्धन विभागाने एकत्रितरित्या मदत व पुनर्वसन प्रभागास न चुकता

सादर करावीत. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

७. सदर निधी जरी मदत व पुनर्वसन विभागाकडून अर्थसंकल्पीत करण्यात आला असला तरी त्याचे सनियंत्रण पशुसंवर्धन विभागाकडे असल्यामुळे सदर निधीचे नियमातील तरतुदीनुसार कोटेकोरपणे लेखापरीक्षण करण्याची जबाबदारी पशुसंवर्धन विभागाची राहील. तसेच यानुषंगाने उद्भवणारे विधीमंडळविषयक, महालेखापाल यांच्या लेखापरीक्षण / लोकलेखा समिती विषयक वा इतर कोणत्याही स्वरुपाचे कामकाज पुर्णत: पशुसंवर्धन विभागाने हाताळणे आवश्यक राहील. वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे लेखे पशुसंवर्धन विभागाने स्वतंत्ररित्या ठेवावेत.

८ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१५१७१४४५८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJASHREE MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dcaac1f1b6f31c7c723db4deb16f5f2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3922ec7b73b6347d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2019.02.15 17:17:26 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री (महसूल/ मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (पदुम विभाग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. प्रधान सचिव, (पदुम ) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा. सचिव (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा. सचिव, मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
९) मा. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
१०) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे
११) आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे
१२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद
१३) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)

१४) जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (सर्व)
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६) संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-६/व्यय-९/व्यय-३/अर्थोपाय कक्ष /वित्त आयोग कक्ष) मंत्रालय, मुंबई
१८) कार्यासन अधिकारी (ब-१/म-७/म-३/पीएसी/पीएसी-१कार्यासने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवडनस्ती (म-११).